**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत नागरी प्रकल्पांतर्गत कार्यरत असलेल्या अस्थायी पदांना दिनांक १.३.२०१७ ते दिनांक ३०.९.२०१७ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. मबाआ-२०१६/प्र.क्र.४२/का-७-अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २३ फेब्रुवारी, २०१७.

वाचा:-

१) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि.५ एप्रिल, २००३.
२) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००३/प्र.क्र.४३८/का६, दि. १४ जानेवारी, २००४.
३) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००५/प्र.क्र.२०० (२)/का-६, दि. ३१ मार्च, २००६.
४) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००७/प्र.क्र.८२)/का-६, दि.१६ ऑक्टोबर, २००७.
५) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००८/प्र.क्र.२३०/का-६, दि.१६ जुलै, २००९.
६) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२०१३/प्र.क्र.२२८/का-७, दि. २१ ऑक्टोबर, २०१३.
७) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०१४/प्र.क्र.४५/का-७, दि.२५/२/२०१४.
८) शासन निर्णय क्र. मबाआ-२०१५/प्र.क्र.१४/का-७अ, दि. २६/३/२०१५.
९) शासन निर्णय क्र. मबाआ-२०१६/प्र.क्र.४२/का-७अ, दि. ६/१०/२०१६.
१०) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, आयुक्तालय,नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का-१/अ.पदे/ २०१७/५३५, दि. १६/०२/२०१७.
११) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क. दि. १०/२/२०१७.

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून सुधारित आकृतीबंध शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५.४.२००३ अन्वये मंजूर केलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेली पदे तसेच संदर्भाधीन महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००५/प्र.क्र.२०० (२)/का-६, दि. ३१ मार्च, २००६ व महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दिनांक १६ ऑक्टोबर, २००७ व शासन निर्णय क्र. एबावि- २००८/प्र.क्र.२३० अ/का-६, दिनांक १६ जुलै २००९ अन्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत नव्याने निर्माण करण्यात आलेली अस्थायी पदे विचारात घेवून एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतील १०४ नागरी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना महिला व बाल विकास विभाग दि. १४.१.२००४ अन्वये प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधातील मंजूर पदांच्या मर्यादेत व मानधनावरील ३२१३९ अस्थायी पदांना दि. १/१०/२०१६ ते दि. २८/२/२०१७ पर्यत पुढे चालू ठेवण्यास शासन निर्णय दिनांक ६/१०/२०१६ अन्वये मान्यता देण्यात आली होती. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी दि. १६.२.२०१७ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे नियमित वेतनश्रेणीतील १०७० पदे व ३१,०६४ मानधनी पदे अशा एकूण ३२,१३४ पदांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग दि. १४.१.२००४ अन्वये प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या अनुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि. १४.१.२००४ अन्वये प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या आढाव्याच्या अधीन राहून उक्त आढाव्यातील मंजूर पदांच्या मर्यादेत १०४ नागरी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील १०७० अस्थायी पदे कार्यरत आहेत. तसेच १५,५३२ अंगणवाडयामधील १५,५३२ अंगणवाडी सेविका व १५,५३२ अंगणवाडी मदतनीस अशी एकूण ३१०६४ मानधनी पदे कार्यरत आहेत. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत १०४ नागरी प्रकल्पातील १०७० अस्थायी पदे व १५५३२ अंगणवाडयामधील एकूण ३१०६४मानधनी पदे अशी एकूण ३२,१३९ पदांना दि. १/३/२०१७ ते ३०.९.२०१७ पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर पदे ही सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत असे आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी प्रमाणित केले आहे. उक्त प्रमाणपत्राच्या अधीन राहून सदर पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

वाचा क्र.११ येथील शासन निर्णयान्वये पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यास दि. ३०/४/२०१७ पर्यत मुदतवाढ देण्यात आली आहे. सर्व प्रशासकीय विभागांनी विभागाच्या आस्थापनेवरील पदांचा तसेच त्या विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेवून आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करुन त्वरीत कार्यवाही करण्याच्या सूचना संबंधीत अधिका-यांना द्याव्यात असे सदर शासन निर्णयान्वये सुचित केले आहे. त्यामुळे दिनांक ३०/४/२०१७ पूर्वी कोणत्याही परिस्थितीत प्रशासकीय विभागांनी पदांच्या आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चित करणे आवश्यक आहे. तसे न केल्यास मुदतवाढी अभावी सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील याची नोंद घ्यावी असे वाचा अनु.क्र.११ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केले आहे. त्यानुसार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी तात्काळ प्रस्ताव शासनास सादर करावा.

वाचा क्र. ११ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये सदर पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळद्वारे उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१७०२२३१५४३३०३४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.03.02 12:01:22 +05'30'

**( ला.रा. गुजर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महारा ष्ट्र राज्य,पुणे

३. महालेखापाल,महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा व अनुज्ञेयता) ( लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,(आयुक्तालयामार्फत)
७. वित्त विभाग (का- व्यय-१४/अर्थसंकल्प-१९//वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई
८. महिला व बाल विकास (का-४) आणि (का-६) मंत्रालय,मुंबई
९. निवड नस्ती, का-७अ